भायखळा जिल्हा कारागृह येथील स्वयंपाकगृहाच्या इमारतीचे नुतणीकरण करणेबाबतच्या खर्चास मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. बांधका ०१२०/७/सीआर-९३/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. २९ फेब्रुवारी, २००४

पहा :- कारागृह महानिरिक्षक , महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांचे पत्र क्र. बांधकाम/गॅस/याजिका/२००३/क-८ पुणे, दि. १.१०.२००३

शासन निर्णय :- भायखळा जिल्हा कारागृह येथे राज्यातील पहिले स्वतंत्र "मुंबई जिल्हा महिला कारागृह" दि. २.१०.२००३ पासून कार्यान्वित करण्यात आलेले आहे. तसेच या कारागृहाची महिला बंदी क्षमता वाढविण्यासाठी नव्याने दुमजली इमारतीचे बांधकाम केंद्र पुरस्कृत योजनेतून सुरु आहे. त्यानुषंगाने महिला बंद्यांना आवश्यक सोयी सुविधा पुरविणे व स्वयंपाकगृहामध्ये गॅस यंत्रणा व नूतनीकरण करुन त्याचे आधूनिकीकरण करण्यासाठी भायखळा जिल्हा कारागृह येथे अद्ययावत स्वयंपाकगृहाची आवश्यकता असल्याने रु. ३,९८,९५०/- एवढ्या रकमेचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्यासाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या दि. १.१०.२००३ च्या पत्रान्वये शासनास विनंती केलेली आहे.

२. भायखळा जिल्हा कारागृह येथे महिला बंद्यांना आवश्यक सोयी सुविधा पुरविण्याच्या दृष्टीने स्वयंपाकगृहामध्ये गॅस यंत्रणा बसविणे व नूतनिकरण करणे बाबतच्या प्रस्तावाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना (७५:२५) या योजनेतर योजनेमध्ये केलेला असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्यासाबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन भायखळा जिल्हा कारागृह येथे महिला बंद्यासाठी आधुनिक स्वयंपाकगृहाची सुविधा पुरविणेसाठी गॅस यंत्रणेसहीत स्वयंपाकगृहाच्या इमारतीचे नूतणीकरण इतर आवश्यक बांधकाम करण्यासाठी येणाऱ्या रु. ३,९८,९५०/- (रुपये तीन लाख अठ्यान्नऊ हजार पन्नास फक्त) इतक्या खर्चाच्या

अंदाजपत्रकास व नकाशास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे. तथापि, निधी उपलब्ध झाल्यानंतरच विहित कार्यपध्दतीने बांधकाम व तद्नुषंगीक कामे हाती घेण्यात यावीत.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (दत्तमत) (२०५६-०९८-२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन सन २००३-२००४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा, व खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात पाठविण्यात यावी.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर ६०/२००४/व्यय-८, दि. ३.२.२००४ अन्वये त्या विभागाच्या मंजुरीन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(र. ना. माळी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग**

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उप महानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई.
- अधिक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह/भायखळा जिल्हा कारागृह.
- अधिक्षक अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग) मंडळ, मुंबई.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
- अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
- वित्त विभाग (व्यय-८), मंत्रालय, मुंबई-३२.
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती / पीआरएस-२.

D:\Yogesh\2004 February\pra-2.35